**ई- ऑफिस कार्यप्रणालीच्या वापरासंदर्भात.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण - २०२३/प्र.क्र. ०२/१८(र. व का.)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ मार्च, २०२३.

**संदर्भ** :-१) शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०२३ /प्र.क्र. ०२/ १८ ( र. व का. ), दि. ०२ फेब्रुवारी, २०२३.
२) शासन परिपत्रक क्रमांक: मातंसं २०२२ / प्र.क्र. ६२/ से- १ / ३९, दिनांक २३.०२.२०२३.

**शासन परिपत्रक :-**

राज्य शासनामध्ये शासकीय कामकाजात संगणकाचा अधिकाधिक वापर करुन शासकीय कामकाज गतिमान व्हावे, कामकाजात सुसूत्रता यावी, दस्तऐवज व माहिती सुरक्षित राहावी, तसेच निर्णय प्रक्रिया गतिमान व सुलभ व्हावी याकरिता मंत्रालयीन विभागांमधील तसेच क्षेत्रीय कार्यालयांतील शासकीय कामकाजात ई- ऑफिस प्रणालीचा प्रभावी वापर करून सदर प्रणाली कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक असलेल्या सूचना उपरोक्त संदर्भीय परिपत्रकांनुसार देण्यात आल्या आहेत. मंत्रालयीन सर्व प्रशासकीय विभागांमधील तसेच क्षेत्रीय कार्यालयांतील शासकीय कामकाजात दि.०१ एप्रिल,२०२३ पासून ई- ऑफिस प्रणालीचा वापर प्रभावी पणे करण्यासाठी संदर्भीय परिपत्रक दिनांक. २३ फेब्रुवारी, २०२३ नुसार मानक कार्यपद्धती निर्गमित करण्यात आली आहे.

२. मंत्रालयीन प्रशासकीय विभाग तसेच क्षेत्रीय कार्यालयांमधील शासकीय कामकाजात सद्य:स्थितीत ई- ऑफिसची कार्यवाही ६.२ या कार्यप्रणालीमध्ये सुरू आहे. सदर कार्यप्रणाली उन्नत करून आता ७.० या कार्यप्रणालीवर सुरू करावयाची आहे. याकरिता सद्य:स्थितीत सुरू असलेली ई- ऑफिस ६.२ ही कार्यप्रणाली दिनांक २९ मार्च, २०२३ ते दिनांक १७ एप्रिल, २०२३ पर्यंत या कालावधीमध्ये उपलब्ध राहणार नाही. तरी सद्य:स्थितीत वापरात असलेल्या ई- ऑफिस कार्यप्रणालीसंदर्भात खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी अशा सूचना देण्यात येत आहेत:-

अ) मंत्रालयीन विभागांतील सद्य:स्थितीत सुरु असलेली ई- ऑफिस कार्यप्रणाली ६.२ मधून ७.० वर उन्नत करण्याकरिता दिनांक २९ मार्च, २०२३ रोजी रात्री ८.०० वाजल्यापासून दिनांक ३ एप्रिल, २०२३ रोजी सकाळी ९.०० वाजेपर्यंत सदर कार्यप्रणाली उपलब्ध राहणार नाही. तरी सदर कालावधीमध्ये मंत्रालयीन विभागांनी ई- ऑफिस कार्यप्रणालीवरील नस्तींबाबतची कार्यवाही तात्पुरत्या स्वरूपात प्रत्यक्षपणे ( फिजिकल ) करावी. ई- ऑफिस कार्यप्रणाली ६.२ मधून ७.० वर उन्नत करुन उपलब्ध झाल्यानंतर नवीन कार्यप्रणालीमध्ये टपाल / नस्त्या स्कॅन करुन दाखल (upload) करण्याची जबाबदारी संबंधित विभागांची राहील. तरी मंत्रालयीन सर्व विभागांनी याबाबतची नोंद घेऊन आवश्यक ती कार्यवाही करावी.

ब) क्षेत्रीय कार्यालयांतील सद्य:स्थितीत सुरु असलेली ई- ऑफिस कार्यप्रणाली ६.२ मधून ७.० वर उन्नत करण्याकरिता दिनांक १३ एप्रिल, २०२३ रोजी रात्री ८.०० वाजल्यापासून दिनांक १७ एप्रिल, २०२३ रोजी सकाळी ९.०० वाजेपर्यंत सदर कार्यप्रणाली उपलब्ध राहणार नाही. तरी सदर कालावधीमध्ये क्षेत्रीय कार्यालयांनी ई- ऑफिस कार्यप्रणालीवरील नस्तींबाबतची कार्यवाही

तापत्पुरत्या स्वरूपात प्रत्यक्षपणे ( फिजिकल ) करावी. ई- ऑफिस कार्यप्रणाली ६.२ मधून ७.० वर उन्नत करुन उपलब्ध झाल्यानंतर नवीन कार्यप्रणाली मध्ये टपाल / नस्त्या स्कॅन करुन दाखल (upload) करण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रीय कार्यालयांची राहील. तरी संबंधित क्षेत्रीय कार्यालयांनी याबाबतची नोंद घेऊन आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३२८१५२५३६९२०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUJATA MANOJ SAUNIK

Digitally signed by SUJATA MANOJ SAUNIK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=04f6ff0d1ef522f4e19358cfac66e30d146fa47249c32a356455a756d05ec1a9, pseudonym=0F4316152AE9704C9E34CC2EF2A8EB14A7151070, serialNumber=F49173DCDA3F795FF41A69777F5A6C2DED24F621CD434ABBB169565D1ABDAA1F, cn=SUJATA MANOJ SAUNIK
Date: 2023.03.28 15:30:44 +05'30'

**( सुजाता सौनिक )**

अपर मुख्य सचिव ( प्र.सु.,र.व का.)

**प्रत-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य.
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. सचिव, राज्य निवडणूक आयोग, पहिला मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई-४०० ०३२.
१३. मा. महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१५. प्रबंधक, मा. मुंबई उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
१६. प्रबंधक, मा. मुंबई उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
१७. प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, १ ला मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई-४०० ०३२.
१८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बँक ऑफ इंडिया इमारत, मुंबई-४०० ०२३.
१९. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
२०. मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
२१. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग, मुंबई.
२२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.

२३. सर्व विभागीय आयुक्त.
२४. सर्व जिल्हाधिकारी.
२५. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२६. मंत्रालयाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख.
२७. निवड नस्ती (कार्यासन-१८), सामान्य प्रशासन विभाग.